राज्यातील एकात्मिक वस्त्रोद्योग संकुलांना अर्थसहाय्य मंजुर करणेबाबत. (अस्मिता इन्फ्राटेक प्रा.लि.भिवंडी, जि.ठाणे.)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टेक्सपा २०१३/प्र.क्र.२२/टेक्स-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १० मार्च, २०२२.

वाचा :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः टेक्सपा-२०११/प्र.क्र.९८/टेक्स-४, दिनांक २५ मे, २०१२.
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः टेक्सपा २०१३/प्र.क्र.२२/टेक्स-४, दिनांक ९ डिसेंबर, २०१३.
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः टेक्सपा २०१३/प्र.क्र.२२/टेक्स-४, दिनांक २९ मार्च, २०१४.
४) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
५) आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांकः कार्या-४/यंत्रमाग/ब-७६/७४८७/२०१९, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.
६) आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांकः कार्या-४/यंत्रमाग/अस्मिता इन्फ्राटेक/ अहवाल ६४६२/२०२१, दिनांक ०२ नोव्हेंबर, २०२१.

प्रस्तावना :-

केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजना सन २००५-०६ या वर्षापासून अंमलात आली आहे. सदर योजनेंतर्गत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुलांना प्रकल्प किंमतीच्या ४०% किंवा रु.४०.०० कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अर्थसहाय्य ४ टप्प्यात मंजूर करण्यात येते. या योजनेंतर्गत राज्यात मंजूर झालेल्या व भविष्यात मंजूर होणा-या एकात्मिक वस्त्रोद्योग संकूलांना प्रकल्प किंमतीच्या ९% किंवा रु.९.०० कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अनुदान देण्याची योजना संदर्भीय दि.२५ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. केंद्र शासन त्यांच्या हिश्याच्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या प्रमाणात मंजूर करेल त्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्याच्या अर्थसहाय्याची रक्कम मंजूर करण्यात येईल, अशी उपरोक्त शासन निर्णयात तरतूद आहे. केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत अस्मिता इंफ्राटेक प्रा. लि. भिवंडी, जि. ठाणे या वस्त्रोद्योग संकुलास केंद्र शासनाचे अंतीम हप्त्याचे रु.४.०० कोटी प्राप्त झाले असून आतापर्यंत पूर्ण रु.४०.०० कोटी अर्थसहाय्य प्राप्त झाले आहेत. तसेच राज्य शासनाकडून देय असलेल्या रु.९.०० कोटी अर्थसहाय्यामधून आतापर्यत रु.७८५.६७ लाख अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले आहे. उर्वरित देय असलेले रु.११४.३३ लाख इतके अर्थसहाय्य मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

केंद्र शासनाने दि. २९ मे, २००८ रोजीच्या पत्रान्वये अस्मिता इंफ्राटेक प्रा. लि. भिवंडी, जि.ठाणे या वस्त्रोद्योग संकुलाच्या रु.२००.८० कोटी इतक्या प्रकल्प अहवालास मान्यता दिलेली आहे. केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत अनुदान देण्याची योजना संदर्भीय क्र.१ येथे नमूद दि.२५ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुरु

करण्यात आली आहे. सदर वस्त्रोद्योग संकुलास केंद्र शासनाच्या हिश्यापोटीचे आतापर्यंत एकूण रु.४०.०० कोटी अर्थसहाय्य प्राप्त झाले आहे. तसेच राज्य शासनाच्या हिश्यापोटीचे एकूण रु.९.०० कोटी देय आहे. त्यापैकी संदर्भीय क्र.२ येथे नमूद दि.९ डिसेंबर, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.५०२.०० लाख व संदर्भीय क्र.३ येथे नमूद दि.२९ मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.२८३.६७ लाख असे एकूण रु.७८५.६७ इतके अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले आहे.

केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत अनुदान मंजूर करण्यासाठी २८५१ ५२६४ या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता रु. ८१३.३३ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत असुन त्यापैकी रु. ४०६.६६ इतका निधी वितरणास उपलब्ध आहे. सदर लेखाशीर्षाखाली आतापर्यंत “निरंक” खर्च झाला आहे. शासन निर्णय दि.२५ मे, २०१२ मध्ये नमूद सर्व अटी व तरतूदी यांचे तंतोतंत पालन सदर वस्त्रोद्योग संकुलाने केले आहे याची शहानिशा आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करण्याच्या अटीवर अस्मिता इंफ्राटेक प्रा. लि. भिवंडी, जि. ठाणे या वस्त्रोद्योग संकुलास रु.११४.३३ लाख ( रुपये एक कोटी चौदा लाख तेहतीस हजार फक्त.)इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अर्थसहाय्य शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर वस्त्रोद्योग संकुलास लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

अ) राज्य शासनाकडून मंजूर होणारा निधी संबंधीत वस्त्रोद्योगाच्या नावे एक दुय्यम खाते (Subsidiary Account) उघडून त्यामध्ये जमा करण्यात यावा.

ब) केंद्र शासनाने त्यांच्या एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत प्रकल्प उभारणी व निधीवरील नियंत्रणासाठी स्पेशल परपज व्हेइकल (SPV) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) यांची जी जबाबदारी निश्चित केली आहे ती जबाबदारी राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधी संदर्भातही राहील. याशिवाय राज्य शासनाने मंजूर केलेल्या निधीच्या वापराबाबत SPV व PMC यांचेबरोबर संचालक वस्त्रोद्योग यांचीदेखील जबाबदारी राहील.

क) केंद्र शासनाने एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेच्या अंमलबजावणीसाठी निर्धारीत केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार निधीचे विनियोजन करण्यासंदर्भात बंधपत्र लिहून देण्याची अट घालण्यात आली आहे. त्याप्रामणे राज्य शासनाच्या हिश्याच्या निधी विनियोजनाबाबत बंधपत्र लिहून देण्याची जबाबदारी संकुलाच्या स्पेशल परपज व्हेइकल (SPV) ची राहील, तसेच बंधपत्र लिहून घेण्याची संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन यांची राहील.

ड) संकुलांना राज्य शासनामार्फत वितरीत केलेल्या अर्थसहाय्याचा योग्य विनियोग होत आहे किंवा कसे याबाबत महालेखापाल यांचेकडून लेखापरिक्षण करण्यात येईल. सदर लेखापरिक्षणासाठी आवश्यक दस्तऐवज महालेखापालांना उपलब्ध करुन देणे प्रर्वतकावर बंधनकारक राहील

३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ सोबतच्या परिशिष्ठातील अ.क्र. ९ येथील “३३-अर्थसहाय्य” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर

अ.क्र.९ मधील तपासणी सूचीतील क्र.६, ७, १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत. तर क्र. १, २, ३, ४, ५, ८, ९ मधील तरतूदी या प्रकरणी लागू असून सदर तरतुदींची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

४. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ नुसार ५, ६, ८, ९, १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत. तर क्र.१, २, ३, ४, ७, मधील बाबींची पूर्तता खालीलप्रमाणे करण्यात आली आहे :-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टो, २०२१ नुसार "३३- अर्थसहाय्य" या बाबीखालील ५०% निधी खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) मंजूर निधी :- "मागणी क्र. व्ही- २, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था (०२) (६०) वस्त्रोद्योग संकुल उभारणे (केंद्र योजना) (कार्यक्रम) ३३, अर्थसहाय्य (२८५१ ५२६४)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पिय अंदाजान्वये प्राप्त तरतूद रु.८१३.३३ लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ५०% म्हणजे रु.४०६.६६ इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- मागील ३ महिन्यात कोणतेही अनुदान वितरीत करण्यात आलेले नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- सदर लेखाशीर्षाखाली एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार वस्त्रोद्योग संकुल योजना राबविण्यात येते.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :- लागू नाही.

९) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.११४.३३ लाख ( रुपये एक कोटी चौदा लाख तेहतीस हजार फक्त.) इतक्या अनुदानाचा खर्च "मागणी क्र.व्ही-२, २८५१- ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था (०२) (६०) वस्त्रोद्योग संकुल उभारणे (केंद्र पुरुस्कृत योजना)(राज्य हिस्सा) (कार्यक्रम)

३३, अर्थसहाय्य (२८५१ ५२६४)" लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.११४.३३ लाख ( रुपये एक कोटी चौदा लाख तेहतीस हजार फक्त.) इतकी रक्कम अस्मिता इंफ्राटेक प्रा. लि. भिवंडी, जि. ठाणे या वस्त्रोद्योग संकुलाच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन वस्त्रोद्योग संकुलाच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, अंधेरी शाखा, अंधेरी (पुर्व), मुंबई या बँकेतील खाते क्र.३०९३०६८६१०१ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. सु.पु. पांगारकर , कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. स.दि. खरात, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि. १४ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.७२०५ दि. १४/१२/२०२१ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०१५०२५६६७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=34e795101cfc08377272f409bc9348c5d84ec89bc33bd49bcb71e896a5e56b29, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2022.03.10 15:04:54 +05'30'

**( स.दि.खरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
२. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
३. उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर,
५. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर,
६. कार्यासन अधिकारी (व्यय-२ / अर्थसंकल्प-१२ / अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८. आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
९. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर,
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, अंधेरी शाखा, अंधेरी ,(पुर्व)मुंबई,
१५. अध्यक्ष, अस्मिता इंफ्राटेक प्रा. लि. भिवंडी, जि.ठाणे,
१६. निवडनस्ती (टेक्स-४).